**प्रशासकीय मान्यता-**
कोरपना,जि.चंद्रपूर येथे न्यायालयीन इमारत बांधण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीसीबी-२०१०/प्र.क्र.१३०/का-१३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,दि. ९ फेब्रुवारी.२०११.

**पहा:-** १) प्रबंधक,(निरीक्षण-२)उच्च न्यायालय(अपील शाखा),मुंबई यांचे पत्र क्र .बी(डब्ल्यू)६०४१/२००७, दि.१६.४.२०१०,
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायालय,चंद्रपूर पत्र जा.क्र.एएस(वर्कस)/४८०/२०१०, दि.२.२.२०१०.

**शासन निर्णय:-** कोरपना,जि.चंद्रपूर येथे न्यायालयीन इमारत बांधण्याच्या रु.४,२६,०३,३४१/-( रुपये चार कोटी, सव्वीस लाख, तीन हजार,तीनशे एकेचाळीस फक्त ) इतक्या अंदाजित खर्चास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये)

| अ.क्र. | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकाम खर्च | ३,२०,९३,९९० |
| २ | आकस्मिकता खर्च(४%) | ११,२८,०५६ |
| ३ | पाणी पुरवठा व मलनिस्सारण (८%) | २२,५६,१११ |
| ४ | विद्युतीकरण (११%) | ३१,०२,१५३ |
| ५ | टर्माइटर ट्रीटमेंट | १,५०,००० |
| ६ | १०% भाववाढीसाठी | ३८,७३,०३१ |
| | **एकूण** | **४,२६,०३,३४१** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे
अ) "काम सुरु करण्यापुर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी."
ब) " मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेवूनच काम सुरु करावे."
क) "अंतर्गत रस्ते व संरक्षक भिंत इत्यादी बांधकामांची छेद नकाशासह मापे विस्तृत अंदाजपत्रकात समाविष्ट करुनच काम सुरु करावे."

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-०५१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, <u>**अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**</u>

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-२२१/इमा-२, दि.२६.१०.२०१० अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र.:-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण-२ ), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, चंद्रपूर,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) ,दोन, महाराष्ट्र, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,चंद्रपूर ,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.१.चंद्रपूर,
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, गडचांदूर,जिल्हा-चंद्रपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर,
उप कोषागार अधिकारी, कोरपना,जि.चंद्रपूर,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,(१४४३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, विदर्भ वैधानिक विकास मंडळ, बी-२३/१,साऊथ अंबाझरी रोड,अंध विद्यालयाजवळ,नागपूर-४४० ०२२,
महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
कक्ष अधिकारी, का. ७,११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.